केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री जनविकास कार्यक्रम अंतर्गत बुलडाणा जिल्ह्यातील शेगाव येथील शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थेत कार्यशाळा व दोन वर्गखोल्या बांधकामाच्या अंमलबजावणीसाठी अनुदान ( केंद्र व राज्य हिस्सा ) वितरित करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अ.वि.वि-२०१७/प्र.क्र.६७/का-७**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय,मुंबई - ४०० ०३२
तारीख: १४/१०/२०२०

**संदर्भ :-**

१. प्र.संचालक व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांचे पत्र जा.क्र.०७/ सीटीएस/ क्षमतावाढ/ २०१७ / ३४३, दिंनाक. ०७/०७/२०१७.
२. अवर सचिव, अल्पसंख्याक कार्य मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्र. MsDP-१३/६१/२०१९-MsDP-MOMA, दि २६/०९/२०१९
३. शासन ज्ञापन -शासन ज्ञापन क्र.अ.वि.वि-२०१७/प्र.क्र.६७/का-७, दि.१४/१०/२०२०

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाच्या अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाच्या प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत PMJVK (पूर्वीचा बहु क्षेत्रीय विकास कार्यक्रम MsDP ) गठित शक्तिप्रदान समितीने दि.१३/०९/२०१९ रोजी झालेल्या १८ व्या बैठकीत बुलडाणा जिल्हयातील शेगाव येथील शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थेत कार्यशाळा व दोन वर्गखोल्या बांधकामाच्या रु. ६५.०० लाख इतक्या रकमेच्या प्रस्तावास मान्यता दिली असल्याचे संदर्भ क्र. (२) अन्वये कळविण्यात आले आहे. सदर प्रस्तावास केंद्र : राज्य हिस्सा हा ६०:४० असून यामध्ये केंद्र शासनाचा एकूण हिस्सा रु.३९.०० लाख व राज्य शासनाचा एकूण हिस्सा २६.०० लाख इतका आहे. तसेच केंद्र शासनाने संदर्भ क्र. (२) येथील आदेशाद्वारे PMJVK अंतर्गत विषयांकित शेगाव येथील शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थेत कार्यशाळा व दोन वर्गखोल्यांच्या बांधकामाकरीता मंजूर/ वितरित करण्यात आलेली **केंद्र हिश्श्यातील पहिल्या टप्प्यातील एकूण रू. १९.५० /- लाख तसेच राज्य हिश्श्यातील पहिल्या टप्प्यातील एकूण रू.१३.०० /- लाख असा एकूण ( केंद्र + राज्य ) रू.३२.५० /- लाख इतका निधी** जिल्हाधिकारी, बुलडाणा यांना मंजूर करून वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

संदर्भ क्रमांक (२) येथील आदेशास अनुसरून प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमा अंतर्गत विषयाकिंत शेगाव येथील शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थेत कार्यशाळा व दोन वर्गखोल्यांच्या बांधकामाकरीता **केंद्र हिश्श्यातील पहिल्या टप्प्यातील एकूण रू. १९.५० /- लाख (अक्षरी एकोनीस लाख पन्नास हजार रूपये फक्त ) तसेच राज्य हिश्श्यातील पहिल्या टप्प्यातील एकूण रू. १३.०० /- लाख ( अक्षरी तेरा लाख रूपये फक्त ) असा एकूण ( केंद्र + राज्य ) रू. ३२.५० /- लाख इतका निधी** विविध

अटींच्या अधीनतेने जिल्हाधिकारी, बुलडाणा यांना खालील तक्त्यातील स्तभं क्र (९) व (१०) प्रमाणे मंजूर करून वितरीत करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमा अंतर्गत विषयाकिंत *शेगाव येथील शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थेत कार्यशाळा व दोन वर्गखोल्यांच्या* बांधकामांचा संक्षिप्त तपशील पुढीलप्रमाणे आहे.

**(रु. लाखात)**

| अ. क्र. | प्रकल्पाचे नाव | युनिटची संख्या | हिश्श्या चे प्रमाण | प्रती युनिट खर्च | केंद्र हिस्सा | राज्य हिस्सा | एकूण | केंद्र शासन पहिला हप्ता | राज्य शासन पहिला हप्ता |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० |
| १ | शेगाव ITI येथे कार्यशाळा व दोन वर्गखोल्या बांधकाम | ०१ | ६०:४० | ६५.०० | ३९.०० | २६.०० | ६५.०० | १९.५० | १३.०० |

३. उपरोक्त तक्त्यातील स्तभं क्र (९) व (१०) प्रमाणे सन २०१९-२० या वर्षात प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमांतर्गत बुलडाणा जिल्ह्यातील शेगाव येथील शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थेत कार्यशाळा व दोन वर्गखोल्यांच्या बांधकामाकरिता केंद्र हिश्श्यातील पहिल्या टप्प्यातील एकूण रू. १९.५० /- लाख *(अक्षरी एकोनीस लाख पन्नास हजार रूपये फक्त)* तसेच राज्य हिश्श्यातील पहिल्या टप्प्यातील एकूण रू.१३.०० /- लाख *( अक्षरी तेरा लाख रूपये फक्त* ) असा एकूण ( केंद्र + राज्य ) रू. ३२.५० /- लाख इतका निधी जिल्हाधिकारी, बुलडाणा यांना सुपूर्द करण्यात येत असून याकरिता ते आहरण व संवितरण अधिकारी आणि नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील.

४. सन २०१९-२० या वर्षात जिल्हाधिकारी, बुलडाणा यांना उपरोक्त तक्त्यातील स्तंभ क्र.(९) व (१०) प्रमाणे मंजूर करण्यात आलेल्या एकूण रकमेच्या मर्यादेत अर्थसंकल्प वितरण प्रणालीतून सदर रक्कम आहरित व संवितरित करण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे. जिल्हाधिकारी, बुलडाणा यांनी प्रधानमंत्री जन विकास कार्यक्रमा अंतर्गत विषयांकित शेगाव येथील शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थेत कार्यशाळा व दोन वर्गखोल्यांच्या बांधकामासाठी या योजनेकरीता आहरित केलेली रक्कम संबंधित अमंलबजावणी यंत्रणेस रितसर वितरित करावी.

५. PMJVK अंतर्गत मान्यताप्राप्त कार्यशाळा व दोन वर्गखोल्यांच्या बांधकामाच्या अमंलबजावणीकरिता **जिल्हा मुख्य नियंत्रक व अमंलबजावणी अधिकारी** हे **जिल्हाधिकारी, बुलडाणा** राहील.

६. PMJVK अंतर्गत मान्यताप्राप्त विकासकामांच्या अमंलबजावणीकरिता संबंधित अमंलबजावणी यंत्रणेने आवश्यक त्या बाबींची त्वरेने पूर्तता करून घ्यावी. शासन निकषानुसार तसेच विकासकामांच्या अंदाजपत्रकास सक्षम प्राधिकरणाने दिलेल्या तांत्रिक मंजुरीनुसार निविदा प्रक्रिया करावी. सक्षम प्राधिका-याची तांत्रिक मंजुरी तसेच प्रत्यक्ष निधी प्राप्त झाल्याशिवाय कामास सुरूवात करू नये. विकासकामांशी संबंधित सक्षम प्राधिकरणाकडून निर्गमित करण्यात येणा-या तांत्रिक मंजुरीच्या/कामाच्या आदेशानुसार,

विकासकामांची अमंलबजावणी विहीत कालावधीत पूर्ण करण्याबाबत जिल्हाधिकारी, बुलडाणा यांनी दक्षता घ्यावी.

७. शासन पत्र, क्र. अविवि-२०१५/प्र.क्र.६८/का.७, दि.२८/०३/२०१६ मधील निर्देशानुसार PMJVK अंतर्गत मान्यताप्राप्त विकासकामांच्या अमंलबजावणीकरिता केंद्र + राज्य हिश्श्या अंतर्गत मंजूर निधी सुरक्षिततेच्या दृषटिकोनातून केवळ राष्ट्रीयीकृत बँकेत ठेवण्यात यावा.

८. सदरचा खर्च करण्यास वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत C.V.C च्या मार्गदर्शक तत्वानुसार / CAG च्या निर्देशानुसार कोणताही शासन निर्णय / अटी व शर्तीचा भंग होणार नाही, याची दक्षता संबंधित जिल्हाधिकारी यांनी घ्यावी. सदर रक्कम वितरित करण्यापूर्वी संबंधित जिल्हाधिकारी यानी शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय / कार्यालयीन आदेश / वित्तीय नियमावली / सार्वजनिक बांधकाम विभागाची कार्यनियमावली / भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक यांचे निरिक्षण अहवाल / वित्तीय कार्यपध्दती यांचा अवलंब करावा. तसेच सदर रक्कम चालू आर्थिक वर्षात उपयोगात आणणे आवश्यक राहील. सदर निधी कोणत्याही संस्थेत ठेव स्वरुपात जमा करता येणार नाही.

९. अमंलबजावणी यंत्रणा यांनी विषयांकीत विकासकामांच्या बांधकामासाठी केंद्र व राज्य शासनाकडून प्राप्त झालेल्या निधीच्या विनियोगाबाबतची उपयोगिता प्रमाणपत्रे तसेच त्रैमासिक अहवाल (QPR) (अद्ययावत छायाचित्रांसह) संबंधीत जिल्हाधिकारी यांच्यामार्फत शासनास सादर करावीत. तसेच विभागाच्या Construction tracker प्रणालीवर देखील विषयांकीत विकासकामांच्या बांधकामाची माहिती वेळोवेळी Upload करावी.

१०. जिल्हाधिकारी, बुलडाणा यांनी मान्यताप्राप्त विकासकामांच्या अमंलबजावणीसाठी दुस-या टप्प्यातील निधीची मागणी करताना पहिल्या टप्प्यात प्राप्त सर्व निधीच्या वापराबाबतची विहित नमुन्यातील उपयोगिता प्रमाणपत्रे तसेच त्रैमासिक अहवाल (QPR) (अद्ययावत छायाचित्रांसह) प्रस्तावासोबत शासनास सादर करावी.

११. PMJVK अंतर्गत प्रस्तावित कामाच्या ठिकणी नामफलक लावण्याबाबतची कार्यवाही दि.१४/१०/२०२० रोजी प्रसिध्द शासन ज्ञापन मधील मुद्दा क्र.४ (१०) अनुसार करण्यात यावी.

१२. केंद्र शासनाच्या अल्पसंख्याक कार्य मंत्रालयाच्या दि.१४/१२/२०१५ रोजीच्या बैठकीतील सूचनेनुसार प्रधानमंत्री जनविकास कार्यक्रम अंतर्गत ज्या प्रयोजनाकरिता निधी मंजूर करून वितरित केला आहे, त्याच प्रयोजनार्थ सदर निधी खर्च करणे बंधनकारक राहील. कोणत्याही परिस्थितीत अन्य प्रयोजनार्थ सदर निधी खर्च केल्यास सर्व संबंधित अधिका-यावर कारवाई करण्यात येईल.तसेच प्रस्तावित विकासकामाकरिता अन्य कोणत्याही योजनेतून अनुदानाचा लाभ घेतलेला नसावा.

१३. केंद्र शासनाच्या मान्यतेनुसार विषयांकीत शेगाव येथील शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थेत कार्यशाळा व दोन वर्गखोल्यांच्या बांधकामातंर्गत केंद्र हिश्श्यावर होणारा खर्च "मागणी क्रमांक झेडई-१, २२३५ - सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० - इतर कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत योजना

(००) (१७) अल्पसंख्याक बहुल क्षेत्रासाठी बहुक्षेत्रीय विकास योजना (केंद्र हिस्सा) ( कार्यक्रमावरील खर्च ) (२२३५ ए ५४३), ३१ - सहाय्यक अनुदान (वेतनेतर)" तसेच राज्य हिश्श्यावर होणारा खर्च "मागणी क्रमांक झेडई-१,२२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० - इतर कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत योजना (०१)(१४) अल्पसंख्याक बहुक्षेत्रिय विकास कार्यक्रम (राज्य हिस्सा) ( कार्यक्रमावरील खर्च )(२२३५ ए २३१) ३१- सहाय्यक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा,

१४. हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि.१६/०४/२०२० अन्वये प्रशासनिक विभागांस प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार तसेच वित्त विभागाच्या अ.नौ.सं.क्र. ११०/२०२०/का-१ दि. १३/०७/२०२० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

१५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२०१०१४१३५४०९७११४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dinesh M.
Sonavane

Digitally signed by Dinesh M. Sonavane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Minorities Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf, serialNumber=6adb2bdbbd3bd651a8ade806b6e4aea66daa5512ea788889af1515751abc0181, cn=Dinesh M. Sonavane
Date: 2020.10.14 13:55:26 +05'30'

**( दि.म.सोनवणे )**
उप सचिव,महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. प्रधान सचिव ,सार्वजनिक बांधकाम विभाग (बांधकामे), मंत्रालय, मुंबई.
२. विभागीय आयुक्त, अमरावती.
३. जिल्हाधिकारी, बुलडाणा.
४. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/नागपूर.
५. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व परीक्षा ) मुंबई/नागपूर.
६. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अमरावती.
७. अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, अकोला.
८. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, बुलडाणा.
९. संचालक,व्यवसाय शिक्षण (प्रशिक्षण) संचालनालय, मुंबई.
१०. सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, अमरावती विभाग, अमरावती.
११. प्राचार्य, औद्योगिक प्रशिक्षण संस्था, शेगाव, जि. बुलडाणा.
१२. जिल्हा कोषागार अधिकारी, बुलडाणा.
१३. वित्त विभाग (अर्थसंकल्प -१४/ व्यय -४) मंत्रालय, मुंबई.
१४. नियोजन विभाग (कार्या.१४७५)
१५. निवड नस्ती, का.७